नागपूर शहराचे मंजूर विकास योजनेनुसार प्रस्तावित विकास योजना रस्ता विकसीत करण्यास्तव महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठांतर्गत खसरा क्र. २३ (भाग) व २७ (भाग) येथील जमीन महसूल विभागास प्रत्यार्पित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: DAHD- १२०१२/०१/२०२४-AH२ (७५११७६)**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : २७ मे, २०२५.**

<u>वाचा</u> :- १) शासन आदेश, कृषि व पदुम विभाग, क्र. मपवि २१०४/ प्र.क्र.७५/पदुम-१, दिनांक १६ एप्रिल, २००५
२) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे क्र. मपमविवि/ बांधकाम/१४४५/२०२४, दिनांक- २० फेब्रुवारी, २०२४ रोजीचे पत्र.
३) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांचे क्र. मपमविवि/ बांधकाम/४७७/२०२४, दिनांक- २३ जुलै, २०२४ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक १६/०४/२००५ रोजीच्या शासन आदेशान्वये मौजा-तेलंगखेडी, नागपूर येथील जागा महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठास हस्तांतरीत करण्यात आलेली आहे.

२. नागपूर महानगरपालिका यांनी मौजा-तेलंगखेडी, खसरा क्र. २३, २४, २५, २६ व २७ या जागेवर नागपूर शहराचे मंजुर विकास योजनेनुसार प्रस्तावित असलेल्या २४.०० मी. रुंद विकास योजना रस्ता विकसीत करण्यास्तव खसरा क्र. २३ (भाग) व २७ (भाग) ही जागा महानगरपालिकेला हस्तांतरीत करण्याकरीता विद्यापीठास कळविले होते.

३. सदर प्रस्तावास विद्यापीठस्तरीय कार्यकारी परिषदेने दिनांक २३/०८/२०२२ रोजीच्या ८९ वी रोजी झालेल्या बैठकीमध्ये ठराव क्र. १११/२०२२ अन्वये मौजा-तेलंगखेडी खसरा क्र. २३ (भाग) व २७ (भाग) येथील सुमारे १३२४८ चौरस मीटर एवढी जागा महानगरपालिका यांना काही अटी व शर्तीच्या अधिन राहून हस्तांतरीत करण्याकरीता मान्यता दिलेली आहे. या अनुषंगाने उक्त जमीन महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

४. महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाची मौजा-तेलंगखेडी, खसरा क्र. २३ (भाग) व २७ (भाग) येथील सुमारे १३२४८ चौरस मीटर एवढी जागा नागपूर शहराचे मंजूर विकास योजनेनुसार प्रस्तावित असलेल्या २४.०० मी. रुंद विकास योजना रस्ता विकसीत करण्यासाठी महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास खालील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

(i) प्रस्तावित बांधकाम ज्या जागेमधून होणार आहे त्या रस्त्याच्या जागेस सर्व बाजुने संरक्षण भिंतीद्वारे संरक्षित करणे. त्यामुळे उर्वरीत रस्त्याचे कडील जागेमध्ये अतिक्रमण होणार नाही. याकरीता रस्ता बांधकामामुळे बाधीत रस्त्याच्या लगत दोनही बाजुनी पक्क्या स्वरुपाची संरक्षक भिंत महानगरपालीका नागपूर यांनी बांधुन देण्याबाबत कार्यवाही अपेक्षीत आहे.

(ii) प्रस्तावित रस्ता विद्यापीठाच्या जागेत ६०० मीटर लांबीचा असल्याने विद्यापीठाची १३२४८ चौरस मीटर जागा बाधीत होत आहे. त्यामुळे त्याप्रमाणात Floor Space Index विद्यापीठाचे प्रस्तावित नविन किंवा जुनी इमारतीकरीता वाढवून देणे बंधणकारक आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२७१५३८३१८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2025.05.27 15:39:06 +05'30'

**( नि.भा.मराळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. अपर मुख्य सचिव, महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
३. जिल्हाधिकारी, नागपूर
४. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
५. मा. मंत्री (पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
७. निवड नस्ती- पदुम-२